**उपविभागीय अभियंता ( स्थापत्य)**
**संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: टीएफएस- २०१७/(१८७/१७)/आ(वर्ग-२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४ सप्टेंबर, २०१७.

संदर्भ :- शासनपत्र क्रमांक संकीर्ण-२०१७/ (१७३/१७)/ आ(वर्ग-२), दिनांक १२ जुलै, २०१७.

**-: आदेश :-**

श्री.सुजित अंबादास कोरे, उपविभागीय अभियंता यांच्या विरुध्द प्राप्त झालेल्या तक्रारींच्या अनुषंगाने त्यांची बदली अधिनियम, २००५ मधील नियम क्र. ४ (४) व ४ (५) नुसार प्रशासकीय कारणास्तव खालील तक्यात नमूद केल्याप्रमाणे बदली करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | सध्या कार्यरत प्रदेश/ मंडळ/ उपविभाग | बदलीने पदस्थापना करण्यात आलेला प्रदेश/मंडळ/ उपविभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.सुजित अंबादास कोरे, उपविभागीय अभियंता | मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे अंतर्गत उपविभागीय अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) उपविभाग, सोलापूर. | मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पाटबंधारे उपविभाग, सोलापूर या रिक्त पदी. (बदली अधिनियम, २००५ मधील नियम क्र. ४ (४) व ४ (५) नुसार) |

२. संबंधित महासंचालक / कार्यकारी संचालक /मुख्य अभियंता यांना कळविण्यात येते कि, सदर अधिकाऱ्यांच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश संबंधितांना तात्काळ प्रसृत करावेत. तसेच सदर अधिकाऱ्यास बदलीच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. वर नमूद केलेल्या उपअभियंत्यांच्या बदली दर्शविलेल्या पदावर यापुर्वी कोणी उपअभियंता कार्यरत असल्यास अशा पदी बदली केलेल्या उप अभियंता यांची पदस्थापना करु नये व त्यांचा सविस्तर प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी नव्याने सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकारी यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र तात्काळ नवीन कार्यालयाकडे पाठविण्याची व्यवस्था करावी.

४. तसेच संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये, म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

**५.** या आदेशाद्वारे बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास रुजू करुन घेतांना, संबंधित प्रशासकीय अधिकारी / कार्यकारी अभियंता यांनी तत्पूर्वी ते रजेवर होते किंवा कसे याची खातरजमा करावी व ते रजेवर असल्याचे आढळल्यास त्यांना हजर करुन घेण्यापुर्वी महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ४० नुसार कार्यवाही करावी व अहवाल शासनास सादर करावा.

**६.** संदर्भाधीन शासनपत्र दिनांक १२ जुलै, २०१७ मधील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करुन सदर शासन आदेशाची अंमलबजावणी तात्काळ करण्यात यावी.

**७.** हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या जलसंपदा विभागाच्या wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यावरुन हया आदेशाची प्रत सर्व संबंधितांनी काढून घ्यावी व पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०६११५८२४२२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinayak Vishwanath Lawate

Digitally signed by Vinayak Vishwanath Lawate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb6e5bc7ae10ae9ecaa376fe734f5ee18589f6a42c0c82108b047be5703d1af3, serialNumber=81fd2869906a1aeee21da3e5d509f89daa03571d84025e4321bc9f87546c02a1, cn=Vinayak Vishwanath Lawate
Date: 2017.09.06 11:47:48 +05'30'

**(विनायक लवटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. प्रधान सचिव (ज.सं.प्र. व नि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (ज.सं.व्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, मृद व जलसंधारण, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
७. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे.
८. अधीक्षक अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ, सोलापूर.
९. अधीक्षक अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, सोलापूर.
१०. सह सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा).
१२. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
१३. आ (वर्ग-२) कार्यासन संग्रहार्थ.